भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील
कनिष्ठ भूवैज्ञानिक (गट-ब) पदावरील
अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन आदेश क्रमांकः आपना २०१४/प्र.क्र.८९/पापु-१५

७वा मजला,जी.टी. रुग्णालय इमारत,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख: १२ सप्टेंबर, २०१४

**शासन आदेश:-**

शासकीय कर्मचाऱ्यांचे बदल्यांचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ नुसार भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेतील कनिष्ठ कनिष्ठ भूवैज्ञानिक पदावरील खाली नमुद केलेल्या अधिका-याची बदली करण्यात येत असून स्तंभ-४ मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या कार्यालयात त्यांची पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.के.बी.इंगळे | जिल्हा परिषद, भंडारा | जिल्हा परिषद, चंद्रपूर |
| २ | श्री. पी.एम.गुजर | जिल्हा परिषद, गडचिरोली | वरिष्ठ भूवैज्ञानिक कार्यालय, अमरावती |

२. सदर आदेश, महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४) (दोन) नुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

३. हे आदेश, तात्काळ अंमलात येत असून, वर नमूद केलेल्या अधिका-यांच्या बदली आदेशांची सर्व संबंधितांनी तात्काळ अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने खालील सुचनांचे कटाक्षाने पालन करावे.

अ) बदली झालेल्या अधिका-यास संबंधित कार्यालय प्रमुखांनी तात्काळ कार्यमुक्त करुन तसे संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांना कळवावे. तसेच, बदली झालेल्या अधिका-यांनी त्यांची पदस्थापना केलेल्या कार्यालयात तात्काळ रुजू व्हावे.

ब) बदली झालेल्या अधिका-यास बदलीच्या ठिकाणी संबंधित कार्यालयात आल्यानंतर विनाविलंब हजर करुन घ्यावे अन्यथा संबंधित कार्यालय प्रमुखास जबाबदार धरण्यात येईल.

क) बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिका-याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणल्यास संबंधित अधिकारी शिस्तभंगविषयक कार्यवाहीस पात्र ठरतील.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१२१८०२४७५२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sawant Mahesh B

Digitally signed by Sawant Mahesh B
DN: CN = Sawant Mahesh B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.09.12 18:19:54 +05'30'

**( म. भ. सावंत )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१ संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
२ उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा ( सर्व)
३.जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा/चंद्रपूर/अमरावती/गडचिरोली
४ संबंधित अधिकारी (संचालकांमार्फत)
५ निवडनस्ती (पापु-१५)